GR-200407291729132001-1100.

**विद्युत अधिनियम २००३ अन्वये केंद्र शासनाने व राज्य शासनाने पार पाडावयाच्या जबाबदाऱ्या व राज्य शासनास सल्ला देण्याकरिता नियुक्त केलेल्या तज्ञ समितीमध्ये सदस्य सचिव पदावर पुर्ननियुक्ती.**

**महाराष्ट्र शासन**

उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,

शासन निर्णय क्रमांक इसीए-२००३/प्र. क्र. ८७२५/ऊर्जा-५,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक :- २६.३.२००४

वाचा:- १) शासन निर्णय क्रमांक इसीए-२००३/प्र.क्र. ८५७९/ऊर्जा-५, दि. २४.९.२००३ व शुध्दिपत्रक दिनांक १.१०.२००३.

२) शासन निर्णय समक्रमांक दिनांक १२.११.२००३.

**प्रस्तावना-**

विद्युत अधिनियम,२००३ दिनाक १० जून २००३ पासून अंमलात आला आहे. सदर अधिनियमानुसार केंद्र शासन व राज्य शासनाने पार पाडावयाच्या जबाबदाऱ्या विहीत केल्या आहेत. त्यामधील तरतूदीनुसार राज्य शासनास सल्ला देण्याकरिता श्री. पी. अब्राहम, माजी केंद्रीय ऊर्जा सचिव व महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळाचे माजी अध्यक्ष यांचे अध्यक्षतेखाली दि. २४.९.२००३ च्या शासन निर्णयान्वये तज्ञ समितीची स्थापना करण्यात आली आहे.

सदर समितीमध्ये सदस्य सचिव म्हणून, श्री.एम. एन. बापट, तांत्रिक संचालक (सेवानिवृत्त) यांची सदस्य सचिवपदी दि. १२.११.२००३ च्या शासन निर्णयाव्दारे नियुक्ती करण्यात आली आहे. श्री. बापट यांनी वैयक्तिक कारणास्तव समितीमधील सदस्य सचिव पदावरुन कार्यमुक्त होण्यास विनंती केली आहे. यास्तव श्री. एम.एन. बापट यांना सदस्य सचिव पदावरुन मुक्त समितीचे सदस्य सचिव पदावर अन्य अधिकाऱ्यांची नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

श्री. पी. अब्राहम यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन केलेल्या तज्ञ समितीचे सदस्य सचिव पदावरुन श्री. एम. एन. बापट यांना कार्यमुक्त करण्यात यावे. सदर पदावर महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळाचे श्री. बी. एन. फरकाडे, तांत्रिक संचालक (वितरण) यांची नियुक्ती करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(र. ना. अंबरित)

शासनाचे उप सचिव